**महसूल सेवक (कोतवाल) पदावर नियुक्तीसाठी लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन ही एक आवश्यक अर्हता म्हणून लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.कोतवा-२०२३/प्र.क्र.१०२ /ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २ जून, २०२५

**संदर्भ:-** (१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१९१/ई-१०, दि.६.४.२०२३
(२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४१२/ई-१०, दि.१४.१०.२०२४

**प्रस्तावना:-**

महसूल व वन विभाग, शासन निर्णय, दि.१.३.२०१९ अन्वये महसूल विभागांतर्गत असणाऱ्या गट ड च्या प्रथम नियुक्तीच्या पदांपैकी नियमित पदांमधून ४० टक्के पदे कोतवालांसाठी राखीव ठेवण्यात आली आहेत. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना, दि.२८.३.२००५ अन्वये शासकीय सेवेतील गट-अ, ब, क आणि ड मधील पदाच्या नियुक्तीसाठी लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन ही एक आवश्यक अर्हता म्हणून विहित करण्यात आलेली आहे. त्यामुळे, महसूल सेवक (कोतवाल) पदाच्या नियुक्तीसाठी लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन ही एक आवश्यक अर्हता म्हणून विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयाच्या दिनांकापासून महसूल सेवक (कोतवाल) पदाच्या नियुक्तीसाठी लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन ही एक आवश्यक अर्हता म्हणून विहित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयातील तरतूदी पुढीलप्रमाणे आहेत.:-

**(१) व्याख्या**- या निर्णयामध्ये, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर, -

(क) "प्रतिज्ञापन" याचा अर्थ, महसूल सेवक (कोतवाल) पदावरील सेवेसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवाराने द्यावयाचे प्रतिज्ञापन, असा आहे;

(ख) "शासन" याचा अर्थ, महाराष्ट्र शासन असा आहे.

(ग) “सेवा" याचा अर्थ, कोतवाल सेवा भरती नियम, १९५९ अन्वये महाराष्ट्र शासनाच्या नियंत्रणाखालील महसूल विभागांतर्गत नियुक्त महसूल सेवक (कोतवाल) पदावरील सेवा असा आहे;

(घ) "लहान कुटुंब" याचा अर्थ, दोन मुले यांसह पत्नी व पती असा आहे;

**(२) स्पष्टीकरण-**

(एक) एखाद्या जोडप्यास हा शासन निर्णय अंमलात येण्याच्या दिनांकाला किंवा त्यानंतर केवळ एकच मूल असेल त्याबाबतीत, नंतरच्या एकाच प्रसूतीत जन्मलेल्या कोणत्याही एकापेक्षा अधिक मुलांना एकच अपत्य म्हणून समजण्यात येईल,

(दोन) "मूल" यामध्ये दत्तक घेतलेल्या मुलाचा किंवा मुलांचा समावेश होत नाही,

**(३) लहान कुटुंबाच्या प्रतिज्ञापनाची आवश्यकता** - महसूल सेवक (कोतवाल) पदावर नियुक्तीसाठी एक अतिरिक्त अत्यावश्यक अट असेल,

परंतु, सदर शासन निर्णय अंमलात येण्याच्या दिनांकास दोनपेक्षा अधिक मुले असणाऱ्या व्यक्तीस, अशा अंमलबजावणीच्या दिनांकास असलेल्या तिच्या मुलांच्या संख्येत जोपर्यंत वाढ होत नाही तोपर्यंत या निर्णयानुसार, नियुक्तीसाठी अनर्ह ठरविण्यात येणार नाही.

परंतु आणखी असे की, सदर शासन निर्णय अंमलात येण्याच्या दिनांकापासून एका वर्षाच्या कालावधीत एकाच प्रसूतीमध्ये जन्मलेले मूल किंवा एकापेक्षा अधिक मुले या नियमात नमूद केलेल्या अनर्हतेच्या प्रत्योजनासाठी विचारात घेण्यात येणार नाही.

**(४) प्रतिज्ञापन सादर करणे-** महसूल सेवक (कोतवाल) पदासाठी अर्ज करण्याची इच्छा असलेली कोणतीही व्यक्ती, अर्जासोबत या निर्णयातील नमुना "अ" मधील प्रतिज्ञापन सादर करील,

**(५) निर्णय लागू नसणे-** जेथे निवड प्रक्रिया ही, हा निर्णय अंमलात येण्याच्या दिनांकापूर्वीच सुरू झाली असेल, त्याबाबतीत हा निर्णय लागू करण्यात येणार नाहीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०२१२४४५११३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SHEETAL MILIND MANE

Digitally signed by SHEETAL MILIND MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=651f752a800385f180f7c05fc4e89bd6797820ce72da7a045a5244b17772036d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=85AE3E6DB78DB8B0DEE29161B3A9E75103B246BA4B42AD8F7E5E19515CE51224, cn=SHEETAL MILIND MANE
Date: 2025.06.02 12:48:38 +05'30'

**(शीतल माने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई.
३) सर्व विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
४) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
५) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मा.मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
१२) सर्व विभागीय आयुक्त.
१३) सर्व जिल्हाधिकारी.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
१५) निवडनस्ती (कार्यासन ई-१०) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रतिज्ञापन**

**नमुना-"अ"**

मी, श्री./श्रीमती/कुमारी -----------------------------------------------------, श्री.---- ------------------------------------------ यांचा/यांची मुलगा/मुलगी/पत्नी, वय ------ वर्षे, राहणार --------------------------------- याद्वारे पुढीलप्रमाणे असे जाहीर करतो/करते की,

(१) मी ----------------- या पदासाठी माझा अर्ज दाखल केलेला आहे.

(२) दिनांक --------- आज रोजी मला ------- (संख्या) इतकी हयात मुले आहेत. त्यापैकी दिनांक- -------- यानंतर जन्माला आलेल्या मुलांची संख्या ----- इतकी आहे. (असल्यास, जन्मदिनांक नमूद करावा.)

(३) हयात असलेल्या मुलांची संख्या दोनपेक्षा अधिक असेल तर दिनांक -------- नंतर जन्माला आलेल्या, मुलामुळे या पदासाठी मी अनर्ह ठरविण्यास पात्र होईल, याची मला जाणीव आहे.

**ठिकाण :**

**दिनांक :**

**(अर्जदाराची सही)**